महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या नागरी पाणी पुरवठा व मलनि:सारण योजनांना अनुदान वितरीत करण्याबाबत.
नगरपरिषद डहाणू, जिल्हा पालघर.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०१४/प्र.क्र. ९३/पापु २२.

जी.टी.रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई ४००००१.
तारीख: ११ फेब्रुवारी, २०१५.

वाचा :-

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ-२००८/प्र.क्र.१/पापु २२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८,
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ-२००८/प्र.क्र.१९८/पापु २२, दिनांक २३ डिसेंबर, २००८,
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ-२०१३/प्र.क्र. १०/पापु २२, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१३,
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ-२०१४/प्र.क्र. ९३/पापु २२, दिनांक ४ मार्च, २०१४,
५) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ-२०१४/प्र.क्र. ९३/पापु २२, दिनांक १२ सप्टेंबर, २०१४.

प्रस्तावना :-

दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये नागरी पाणी पुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दिष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे असा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाच्या अंमलबजावणीसाठी विहित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या पाणी पुरवठा योजनेसाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने भरलेल्या स्वहिश्श्याच्या प्रमाणात अनुज्ञेय अनुदान वितरीत करण्यात येते. नगरपरिषद डहाणू, जि.पालघर या नागरी संस्थेने स्वहिश्श्यापैकी रुपये ३००.०० लक्ष इतकी रक्कम

भरणा केली असल्याने त्यांना राज्य शासनाकडून अनुज्ञेय असलेल्या अनुदानापैकी उर्वरीत अनुदान म्हणजेच रु.६३४.९९ लक्ष इतके अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या नगरपरिषद डहाणू, जि.पालघर येथील पाणी पुरवठा व मलनि:सारण योजनेस संदर्भिय अनुक्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात आली असून संबंधित नागरी स्थानिक संस्थेने त्यांच्या स्वहिश्श्यापैकी रु.३००.०० लक्ष इतकी रक्कम बँकेत भरणा केली असल्याने अनुज्ञेय अनुदानाच्या उर्वरीत अनुदान म्हणजेच रुपये ६३४.९९ लक्ष (रु.सहा कोटी चौतीस लाख नव्व्याण्णव हजार फक्त) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

**(रुपये लाखात)**

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेने निकषा नूसार भरावयाची रक्कम (१०%) | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | या अगोदर शासना कडून वितरीत करण्यात आलेले अनुदान | राज्य शासना कडून वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| डहाणू, जि.पालघर (क वर्ग नगरपालिका) | ३००६.१० | २७०५.४९ | ३००.६१ | ३००.०० | १७९९.९६ | ६३४.९९ |
| | | | | | **एकूण** | **६३४.९९** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना, (०२)(०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व मलनि:सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांनी सदर लेखाशीर्षाखाली शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमुद स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेला अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावीत.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक सुनिअ-२००८/प्र.क्र.१/पापु २२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१०१९१४५५६७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Francis Dsouza

Digitally signed by Ramesh Francis Dsouza
DN: CN = Ramesh Francis Dsouza, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.02.11 12:39:29 +05'30'

**(र. फ्रा. डिसोझा)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव,
२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
४. महालेखापाल-१ मुंबई/ नागपूर,
५. संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई,
६. विभागीय आयुक्त, कोकण महसुल विभाग,
७. जिल्हाधिकारी, पालघर,
८. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे,
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
१०. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई,
११. अध्यक्ष/मुख्याधिकारी, डहाणू नगरपरिषद, जिल्हा पालघर,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर,
१३. जिल्हा प्रकल्प अधिकारी (नगरपालिका), जिल्हाधिकारी कार्यालय, पालघर,
१४. वित्त विभाग/ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. कक्ष अधिकारी, पापु-०४ / पापु-२० / पापु २४, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. निवडनस्ती, पापु-२२, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.